**कुडाळी मध्यम प्रकल्प, ता. जावळी, जि.सातारा द्वितीय सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**जलसंपदा विभाग**

**शासन निर्णय क्रमांक :- सुप्रमा-२०१७/४३८/( प्र.क्र.१२८/१७)/ म.प्र.**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

**दिनांक :- ०३ नोव्हेंबर,२०१८.**

**संदर्भ:-** १) महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ,पुणे यांचे निर्णय क्र. मकृखोविमं/कुडाळी २९६/(२४/९६)/प्रशा-२, दि. ०६/०८/१९९६.

२) शासन निर्णय क्र. सुप्रमा-२००७/(१७९/२००७)-म.प्र., दि. ०६/११/२००७

३) कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ,पुणे यांचे पत्र मकृखोविम/२११/(१२०३/२०११)प्रशा-५/१५८५, दि. १७/०४/२०१७.

**प्रस्तावना:-**

कुडाळी मध्यम प्रकल्पांतर्गत मौजे महू ता. जावळी, जि. सातारा येथे कुडाळी नदीवर महू धरण व मौजे हातगेघर ता. जावळी , जि. सातारा येथे हातगेघर नाल्यावर हातगेघर धरण अशी दोन माती धरणे प्रस्तावित आहेत. महू व हातगेघर धरणांची एकूण साठवण क्षमता अनुक्रमे १.१० अ.घ.फु. व ०.२६ अ.घ.फु. इतकी आहे. महू व हातगेघर धरणाच्या जलाशयावर प्रत्येकी दोन अशा एकूण ४ उपसा सिंचन योजना प्रस्तावित असून त्याद्वारे एकूण ४६१ हे. क्षेत्रास सिंचन लाभ देणे नियोजित आहे. तसेच ३ कि.मी. लांब भरण कालवा, ३२ कि.मी. लांब उजवा कालवा व १७ कि.मी. लांब डाव्या कालव्याद्वारे एकूण ४८६६ हे. क्षेत्रास सिंचन लाभ देणे नियोजित आहे. अशा प्रकारे प्रकल्पद्वारे सातारा जिल्हयातील जावळी तालुक्यातील ४२ गावांतील ५३२७ हे. क्षेत्रास सिंचनलाभ देणे प्रस्तावित आहे.

कुडाळी मध्यम प्रकल्प ,ता.जावळी ,जि .सातारा प्रकल्पास संदर्भ क्र. १ नुसार सन १९९३-९४ चे दरसूचीवर आधारीत रू. ६३.४७ कोटी (रूपये त्रेसष्ठ कोटी सत्तेचाळीस लक्ष फक्त) इतक्या रकमेस मुळ प्रशासकीय मान्यता व संदर्भ क्र.२ नुसार सन २००५-०६ चे दरसूचीवर आधारीत रू. २७१.७९ कोटी (रूपये दोनशे एकाहत्तर कोटी एकोण्णंशी लक्ष फक्त) इतक्या रकमेस प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान केली होती.

कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे यांचे संदर्भ क्र.३ अन्वये सन २०१३-१४ चे दरसूचीवर आधारीत रु. ६३५.४६ कोटी किंमतीचा द्वितीय सुधारित प्रशासकीय मान्यतेचा प्रस्ताव मान्यतेस्तव शासनास सादर केला आहे. सदर द्वितीय सुधारित प्रशासकीय मान्यतेचा प्रस्तावास व्यय अग्रक्रम समितीची मान्यतेकरिता सादर करण्यासाठी नियोजन व वित्त विभागाची सहमती करिता प्रस्ताव सादर केले असता द्वितीय सुधारित प्रशासकीय मान्यतेचा प्रस्ताव मा.मंत्रीमंडळाच्या मान्यतेस्तव सादर करण्यास संबंधीत विभागांनी कळविले आहे. प्रकल्पाचे लाभ व्यय गुणोत्तर १.६१८ येत असून प्रकल्प आर्थिक मापदंडात बसतो.

सदर प्रकल्पाचा प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता किंमत रु. २७१.७९ कोटी च्या तुलनेत द्वितीय सुधारित प्रकल्प अहवालाची किंमत रु. ३६३.६६ कोटीने जास्त आहे. किंमत वाढीची प्रमुख कारणे पुढीलप्रमाणे आहेत :-

| अ.क्र. | बाब | वाढ (रुपये कोटी) |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| १ | दरसूचीतील बदलामुळे | १०७.१३ |
| २ | भूसंपादन किंमतीतील वाढ | ८१.४० |
| ३ | जादा दराची निविदा स्वीकृत केल्याने झालेली वाढ | २.६९ |
| ४ | संकल्पचित्रातील बदलामुळे झालेली वाढ | २२.६७ |
| ५ | अपु-या तरतूदीमुळे झालेली वाढ | ९९.५१ |
| ६ | नविन तरतुदी | ४.३० |
| ७ | इतर कारणामुळे झालेली वाढ | १८.१३ |
| ८ | अनुषंगिक खर्च | २७.८३ |
| | **एकुण वाढ** | **३६३.६६** |

प्रकल्पाचा संकल्पीत पाणीसाठा १.३६ अ.घ.फू. असून एकुण पाणीवापर १.७१ अ.घ.फू इतका आहे. सातारा जिल्हयातील जावळी तालुक्यातील ४२ गावांतील ५३२७ हे. क्षेत्रास सिंचनलाभ देणे प्रस्तावित आहे. सदर प्रकल्प केंद्र शासनाच्या प्रधानमंत्री कृषी सिंचाई योजने अंतर्गत समाविष्ठ आहे. सदर प्रस्ताव मा. मंत्रीमंडळच्या दि. १६/१०/२०१८ रोजीच्या बैठकीत विचारार्थ सादर करण्यात आला.

मा. मंत्रीमंडळाने बांधकामाची सद्य:स्थिती, किंमतवाढीची कारणमीमांसा इ. बाबींचा परामर्श घेऊन कुडाळी मध्यम प्रकल्पाच्या सन २०१३-१४ दरसूची वर आधारित रु. ६३५.४६ कोटी किंमतीच्या द्वितीय सुधारित प्रकल्प अहवालास प्रशासकीय मान्यता देण्याचा जाणीवपूर्वक निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

शासन आता या निर्णयाव्दारे कुडाळी मध्यम प्रकल्पाच्या सन २०१३-१४ च्या दरसूचीवर आधारीत रु.६३५.४६ कोटी (रूपये सहाशे पस्तीस कोटी सेचाळीस लक्ष फक्त) इतक्या किंमतीच्या द्वितीय सुधारीत प्रकल्प अहवालास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. त्यापैकी रु. ५७५.२३ कोटी (रुपये पाचशे पच्यांहत्तर कोटी तेविस लक्ष फक्त) कामाप्रित्यर्थ व रु. ६०.२३ कोटी (रुपये साठ कोटी तेवीस लक्ष फक्त) अनुषंगिक खर्चासाठी तरतूद आहे. सोबत उपशिर्ष निहाय तरतुदींचा गोषवारा दिलेला आहे.

२. या योजनेस प्रदान केलेली द्वितीय सुधारित प्रशासकीय मान्यता मध्यम प्रकल्प कार्यासनाच्या नोंदवहीमध्ये अनुक्रमांक ३ / २०१८ वर नोंदवण्यात आली आहे.

३. सदर प्रकल्पाचे उर्वरित काम नियोजित वेळेत व सुधारित प्रशासकीय मान्यता तरतूदीच्या मर्यादेत पूर्ण करण्यात यावे.

४. या प्रकल्पाच्या कामावर होणारा खर्च मुख्य लेखाशीर्ष ४७०१ मोठे व मध्यम पाटबंधा-यावरील भांडवली खर्च ०३, मध्यम पाटबंधारे प्रकल्प (वाणिज्यिक) कुडाळी पाटबंधारे प्रकल्प (योजनांतर्गत) या लेखाशिर्षाखाली खर्च टाकावा व त्याखालील मंजुर अनुदानातून भागविण्यात यावा.

५. सदर द्वितीय सुधारित प्रशासकीय मान्यता खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

५.१) राज्यस्तरिय तांत्रिक सल्लागार समितीच्या अहवालातील मुद्या क्र. २६ व २७ मधील निरीक्षणांची पूर्तता करावी.

५.२) आर्थिक दायित्व निर्माण होईल अशा नवीन घटकांचा शासन मान्यतेशिवाय प्रकल्पात समावेश करू नये.

५.३) प्रकल्पाचे काम नियोजनानुसार व सुधारित प्रशासकीय मान्यता किंमतीच्या मर्यादेत पूर्ण करण्यात यावे.

५.४) प्रगतीपथावरील निविदांची कामे प्राधान्याने पूर्ण करण्यात यावीत. पाणीसाठ्याचा सिंचनाकरिता जास्तीत जास्त लाभ होईल अशाप्रकारे उर्वरित कामांचा प्राधान्यक्रम निश्चित करण्यात यावा व त्यानुसार कामे / निविदा प्रक्रिया करण्यात यावी.

५.५) संपूर्ण लाभक्षेत्रामध्ये पाणी वापर संस्था स्थापन करुन सिंचन व्यवस्थापन पाणी वापर संस्थेस हस्तांतरित करावे.

५.६) सुधारित प्रशासकीय मान्यता म्हणजे प्रकल्प कार्यान्वितीकरणाच्या विविध टप्प्यांवर क्षेत्रिय अधिका-यांनी घेतलेल्या विविध निर्णयास व क्षेत्रिय अनियमितता झाली असल्यास अशा अनियमिततेस सहमती असल्याचे गृहीत धरता येणार नाही.

६. सदर शासन निर्णय दि. १६/१०/२०१८ रोजी झालेल्या मा. मंत्रीमंडळाच्या बैठकीतील निर्णयानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णयाची अंमलबजावणी निर्गमित दिनांकापासून करण्यात यावी.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१८११०३१३३४३५३५२७ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dharane Mallikarjun Irappa

Digitally signed by Dharane Mallikarjun Irappa
DN: CN = Dharane Mallikarjun Irappa, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Water Resources Department
Date: 2018.11.03 13:37:14 +05'30'

**सहपत्र :- उपशीर्षनिहाय तरतुदींचा गोषवारा**

**(म.ई.धरणे)**
शासनाचे उप सचिव

**प्रत, सहपत्रांसह :-**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.

२) मा. मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा.मंत्री (जलसंपदा) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
४) मा.राज्यमंत्री (जलसंपदा) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
५) मा.मुख्य सचिव यांचे स्वीय सहाय्यक,मंत्रालय, मुंबई
६) अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
७) अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
८) प्रधान सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
९) सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१०) सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
११) महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/ नागपूर.
१२) कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर.
१३) मुख्य अभियंता (द.व प्र) व सहसचिव यांचे स्वीय सहाय्यक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४) मुख्य अभियंता, (वि.प्र.),जलसंपदा विभाग, अमरावती.
१५) उपसचिव (मो.प्र-१/ मो.प्र-२/जसं/निवसं/सिंव्य/लाक्षेवि/लपा/जवि),यांचे स्वीय सहाय्यक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६) आंतरवित्त सल्लागार व उपसचिव यांचे स्वीय सहाय्यक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१७) अधीक्षक अभियंता,सातारा पाटबंधारे प्रकल्प मंडळ, सातारा.
१८) कार्यकारी अभियंता, धोम कालवे विभाग क्र.२, सातारा.
१९) वित्त विभाग ( व्यय-१२/ अर्थ-०२/अर्थ-१०/व्यय-६ अ ), मंत्रालय, मुंबई.
२०) नियोजन विभाग (कार्यासन १४३४), मंत्रालय, मुंबई.
२१) मध्यम प्रकल्प कार्यासन संग्रहार्थ.

# कुडाळी मध्यम प्रकल्प, ता. जावळी, जि.सातारा

## उपशीर्ष निहाय तरतुदींचा गोषवारा

### शासन निर्णय क्र. सुप्रमा-२०१७/४३८/(प्र.क्र.१२८/१७)/म.प्र., दि. ०३/११/२०१८ चे सहपत्र.

| अ.क्र. | उपशीर्ष | द्वितीय सुधारित प्रशासकीय मान्यता अंदाजपत्रक (रुपये लक्ष) |
|---|---|---|
| [अ] शिर्ष कामे | | |
| १ | ए-प्राथमिक | १८.१९ |
| २ | बी-भूसंपादन | ५०९१.१७ |
| ३ | सी-कामे | २६८९३.४२ |
| ४ | डी-रेग्युलेटर | २४८६.४९ |
| ५ | के-बिल्डींग | ३५.५४ |
| ६ | एम-वृक्षारोपन | २.०० |
| ७ | ओ-संकिर्ण | ८.७५ |
| ८ | पी-देखभाल | २८५.२४ |
| ९ | क्यु - स्पे.टी.अँड पी | १५.७५ |
| १० | आरदळणवळण - | ४७४.०० |
| ११ | एक्स § पर्यावरण | ५.०० |
| १२ | वाय-लॉसेस | ७४.७४ |
| | **एकूण [अ]** | **३५३९०.२८** |
| [ब] कालवे व वितरण व्यवस्था | | |
| १ | ए-प्राथमीक | २०.७४ |
| २ | बी-भुसंपादन | ५४३६.३५ |
| ३ | सी-कामे | ३०१.०७ |
| ४ | डी-रेग्युलेटर | ४१३.९२ |
| ५ | ई-फ़ाल्स | ५१५.१३ |
| ६ | एफ़-आरएचटी वर्क्स | ३७५९.१५ |
| ७ | जी-ब्रिजेस | ५०५.३६ |
| ८ | एच-एस्केप | ५२.९० |

| अ.क्र. | उपशीर्ष | द्वितीय सुधारित प्रशासकीय मान्यता अंदाजपत्रक (रुपये लक्ष) |
|---|---|---|
| ९ | के-बिल्डींग | १२.९० |
| १० | एल-मातीकाम | ४५१८.८६ |
| ११ | एम-वृक्षारोपन | १५.९६ |
| १२ | ओ-संकिर्ण | १.१४ |
| १३ | पी-देखभाल | १०१.१० |
| १४ | क्यु - स्पे.टी.अँड पी | ११.४३ |
| १५ | आरदळणवळण- | ३१.०६ |
| १६ | यु § वितरीका | ३४०३.०० |
| १७ | व्ही-वॉटर कोर्सेस | २३८४.६६ |
| १८ | डब्ल्यू § ड्रेनेज | ६०६.८० |
| १९ | वाय-लॉसेस | ४१.२६ |
| | **एकूण [ब] :** | **२२१३२.७९** |
| | **[क] एकूण कामे ( अ+ब) :** | **५७५२३.०७** |
| | **[ड] ईटीपी व इतर चार्जेस:** | **६०२३.२१** |
| | **[इ] एकूण(क+ड)** | **६३५४६.२८** |

Dharane Mallikarjun Irappa

Digitally signed by Dharane Mallikarjun Irappa
DN: CN = Dharane Mallikarjun Irappa, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Water Resources Department
Date: 2018.11.03 13:37:36 +05'30'

**(म.ई.धरणे)**
शासनाचे उप सचिव